राज्य पोलीस दलातील वाहन अनुज्ञेयतेच्या धोरणानुसार कमतरता असलेली २२९८ वाहने खरेदी करण्यासाठी वित्तीय वर्ष २०२४-२५ ते २०२७-२८ या कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक पीईक्यू-०२२४/प्र.क्र.१७२/पोल-४,**

गृह विभाग,मंत्रालय मुंबई- ४०० ०३२,

दिनांक :- ३१ जुलै, २०२४.

**संदर्भ:-** १) अपर पोलीस महासंचालक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य पोलीस मुख्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१९/३२-वाहने/वाहनांची मागणी/१७/२०१९,दि.०३.०४.२०२४

२) अपर पोलीस महासंचालक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य पोलीस मुख्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१९/३२-वाहने/वाहनांची मागणी/१७/२०१९,दि.०४.०७.२०२४

**प्रस्तावना:-**

मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई येथे दाखल सुमोटो क्रमांक KKT-Suo Moto C.N.७७७९/१३/३०/२०२३ च्या अनुषंगाने, पोलीस महासंचालक कार्यालयाने उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वाहन धोरण आढाव्यानुसार राज्य पोलीस दलात कमतरता असलेली २२९८ वाहने खरेदी करण्यासाठी सन २०२४-२५, सन २०२५-२६, सन २०२६-२७ व सन २०२७-२८ या चार वित्तीय वर्षाच्या कृती आराखडयास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** पोलीस महासंचालक कार्यालयाने उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने गृह विभाग, शासन निर्णय दि.०५.१२.२०१७ अन्वये मंजूर वाहन धोरण आढाव्यानुसार राज्य पोलीस दलात कमतरता असलेली खालील तपशिलातील २२९८ वाहने खरेदी करण्यासाठी सन २०२४-२५, सन २०२५-२६,सन २०२६-२७ व सन २०२७-२८ या चार वित्तीय वर्षाच्या कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**पोलीस महासंचालक कार्यालयाकडून सन २०२४-२५ ते सन २०२७-२८ मध्ये खरेदी करण्यात येणाऱ्या वाहनांचा कृती आराखडा**

(रक्कम रु लाखात)

| अ. क्र. | वाहनांचा प्रकार | प्रति नग रु. | सन २०२४-२५ | | सन २०२५-२६ | | सन २०२६-२७ | | सन २०२७-२८ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) |
| १ | कार | १०.०० | १९ | १९०.०० | १७ | १७०.०० | १७ | १७०.०० | १८ | १८०.०० |

पोलीस महासंचालक कार्यालयाकडून सन २०२४-२५ ते सन २०२७-२८ मध्ये खरेदी करण्यात येणाऱ्या वाहनांचा कृती आराखडा (रक्कम रु लाखात)

| अ. क्र. | वाहनांचा प्रकार | प्रति नग रु. | सन २०२४-२५ | | सन २०२५-२६ | | सन २०२६-२७ | | सन २०२७-२८ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) | वाहन संख्या | एकूण किंमत (रुपये) |
| २ | पिक अप व्हॅन (डयुअल कॅबिन लाईट व्हॅन) | २४.०० | २५० | ६०००.०० | ४७० | ११२८०.०० | ४७० | ११२८.०० | ४७० | ११२८०.०० |
| ३ | एसी डॉग व्हॅन | २५.०० | ४ | १००.०० | ४ | १००.०० | ४ | १००.०० | ५ | १२५.०० |
| ४ | ट्रक | २१.४९ | २८ | ६०१.७२ | ३२ | ६८७.६८ | ३२ | ६८७.६८ | ३३ | ७०९.१७ |
| ५ | वॉटर टँकर | २६.७० | ५ | १३३.५० | ७ | १८६.९० | ७ | १८६.९० | ९ | २४०.३० |
| ६ | बस (पर्सनल कॅरिअर | २९.९५ | ६० | १७९७.०० | ६७ | २००६.६५ | ६७ | २००६.६५ | ६८ | २०३६.६० |
| ७ | वरुण | ३०.०० | १५ | ४५०.०० | १८ | ५४०.०० | १८ | ५४०.०० | १९ | ५७०.०० |
| ८ | आर आय व्ही | २९.६५ | १० | २९६.५० | १५ | ४४४.७५ | १५ | ४४४.७५ | १६ | ४७४.४० |
| ९ | कमांड पोस्ट व्हॅन (कंट्रोल व्हॅन) | ६७.०० | १ | ६७.०० | २ | १३४.०० | २ | १३४.०० | ४ | २६८.०० |
| Total | | | ३९२ | ९६३५.७२ | ६३२ | १५५४९.९८ | ६३२ | १५५४९.९८ | ६४२ | १५८८३.४७ |

२. सदर प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहील.

१) वित्त विभाग, शासन निर्णय दि.०२.०२.२०२४ नुसार पोलीस महानिरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांना रुपये १२.०० लक्ष किंमतीचे वाहन अनुज्ञेय आहे. पोलीस अधीक्षक व त्यावरील अधिकारी यांच्याकरीता रुपये ९.०० लक्ष मर्यादेतील वाहन अनुज्ञेय आहे. तरी या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांना अनुज्ञेय असलेल्या किंमतीच्या मर्यादेतील वाहने खरेदी करण्यात यावीत.

२) वाहनांची खरेदी मंजूर अनुदानातून व खरेदी नियमांच्या विहित कार्यपध्दतीचे पालन करुन करावी.

३) गृह विभाग, शासन निर्णय दि.०५.१२.२०१७ च्या शासन निर्णयातील वाहन अनुज्ञेयतेनुसारच विभागाने खरेदी करावी.

४) सदरची खरेदी ही अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध निधीच्या मर्यादेतच करण्यात यावी.

५) सदरची वाहने खरेदी करताना कमतरता असलेल्या २२९८ वाहनांच्या मर्यादेतच खरेदी करण्यात यावी. तसेच, कोणत्याही परिस्थितीत अनुज्ञेय वाहनांपेक्षा वाहनांची संख्या अधिक होणार नाही. याबाबतची दक्षता घेण्याची सर्वस्वी जबाबदारी पोलीस महासंचालक कार्यालयाची राहील.

६) सदर वाहने अर्थसंकल्पीय तरतूदीची उपलब्धता विचारात घेऊन , जिल्हा नियोजन समितीच्या माध्यमातून आणि अन्य स्त्रोतांद्वारे उपलब्ध होऊ शकणारा संभाव्य निधी विचारात घेऊन, प्रचलित कार्यपध्दती अनुसरुन, मंजूर वाहन आढाव्याच्या दि.०५.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील अनुज्ञेय वाहन प्रकार व वाहन संख्येच्या मर्यादेत वाहने खरेदी करण्यात यावी.

७) सदर वाहनांच्या खरेदीबाबत पोलीस महासंचालक कार्यालयाने नियमित आढावा घेऊन वेळोवेळी अहवाल शासनास सादर करावा.

३. याबाबतचा खर्च " गृह विभाग, मागणी क्र.बी-१,२०५५ पोलीस (००)१०९ जिल्हा पोलीस (००) (०९) जिल्हा पोलीस दल (कार्यक्रम) (२०५५०५१५) ५१- मोटार वाहने " या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२३/का १४६१ अन्वये आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०७/२०२४/व्यय-७, व अनौपचारिक संदर्भ क्र.२८५/२०२४/विनियम, दि.२९.०७.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७३११२२५३०४९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.07.31 12:44:07 +05'30'

**(रा.ता.भालवणे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. सर्व सन्मानिय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य
५. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२

७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
८. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.अवर सचिव,वित्त विभाग (विनियम/व्यय), मंत्रालय, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (का-१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.अधिदान व लेखा अधिकारीनिवासी/ लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७.निवडनस्ती /पोल-४